महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ कलम २२ (१) नुसार राज्यातील प्रत्येक नदी खोरे अभिकरणाकरिता प्राथमिक विवाद निवारण अधिकारी प्राधिकृत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००९/ २६५/ ०९/ सिंव्य धो
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक - २५ ऑगस्ट, २००९

संदर्भ - शासन निर्णय क्रमांक एसयुटी २००९/ ७६/ ०९/ सिंव्य धो, दिनांक १५-७-२००९.

प्रस्तावना -

महाराष्ट्र राज्यामधील जलसंपत्तीचे विनियमन करण्याकरिता, जलसंपत्तीचे कुशल, समन्यायी व टिकाऊ व्यवस्थापन, वाटप व वापर सुकर करण्याकरिता आणि त्यांची सुनिश्चिती करण्याकरिता, कृषीविषयक, औद्योगिक, पिण्याच्या व इतर प्रयोजनांसाठी, वापरावयाच्या पाण्याचे दर निश्चित करण्याकरिता, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ अन्वये, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण स्थापन करण्यात आले आहे.

या अधिनियमाच्या कलम २ (प) नुसार, नदी खोरे अभिकरण म्हणून, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांना विनिर्दिष्ट करण्यात आले आहे.

या अधिनियमाच्या कलम १३ नुसार, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण व विवाद सोडविणाऱ्या अधिकाऱ्यास, विशिष्ट बाबींच्या संबंधात, दिवाणी प्रक्रिया संहिता, १९०८ अन्वये दिवाणी न्यायालयाने विहित केले असतील असे अधिकार आहेत.

या अधिनियमाच्या कलम २२ (१) नुसार, राज्य शासनास, पाण्याचे हक्क देण्याच्या किंवा त्याचे वितरण करण्याच्या संदर्भातील विवाद मिटविण्यासाठी, प्राथमिक विवाद निवारण अधिकारी म्हणून, प्रत्येक नदी खोरे अभिकरणाकरिता विहित केल्यानुसार, कोणताही एक किंवा अनेक सक्षम अधिकारी प्राधिकृत करता येऊ शकतात.

या अधिनियमाच्या कलम २२ (३) नुसार, प्राथमिक विवाद निवारण अधिका-याच्या आदेशाने व्यथित झालेल्या कोणत्याही व्यक्तीस, असा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून साठ दिवसांच्या आत, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांच्याकडे अपील दाखल करता येऊ शकते.

राज्यातील प्रत्येक नदी खोरे अभिकरणाकरिता, प्राथमिक विवाद निवारण अधिकारी प्राधिकृत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय -

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ कलम २२ (१) नुसार, राज्यातील प्रत्येक नदी खोरे अभिकरणासाठी पुढीलप्रमाणे प्राथमिक विवाद निवारण अधिकारी प्राधिकृत करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | खोरे | प्राथमिक विवाद निवारण अधिकारी | विवाद निवारणासाठी कार्यक्षेत्र | जिल्हे |
|---|---|---|---|---|
| १ | गोदावरी (उर्ध्व) | मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक | गोदावरी खोरे (पैठणपर्यंत व वैनगंगा उपखोरे वगळून) | नाशिक, अहमदनगर (अंशतः) औरंगाबाद (अंशतः) |
| २ | गोदावरी (निम्न) | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, औरंगाबाद | पैठणपासून राज्य सीमेपर्यंत (वैनगंगा उपखोरे वगळून) | औरंगाबाद (अंशतः), बीड, जालना, परभणी, नांदेड, लातूर |
| ३ | वैनगंगा (नागपूर) | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | नागपूर प्रदेशातील वैनगंगा खोरे | नागपूर, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, गोंदिया |
| ४ | वैनगंगा (अमरावती) | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | अमरावती प्रदेशातील वैनगंगा खोरे, अमरावती प्रदेशातील तापी खोरे | अमरावती, यवतमाळ, वर्धा, अकोला, वाशिम, हिंगोली, बुलडाणा |
| ५ | कृष्णा | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे | कृष्णा (मुख्य खोरे), कोयनेसहित उपनद्या, भीमा उपखोरे पुण्यापर्यंत | पुणे शहर, पुणे जिल्हा, (अंशतः), सातारा, सांगली, कोल्हापूर |
| ६ | भीमा | मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे | नीरा, कुकडी यासह भीमा खोरे पुण्यापासून राज्य सीमेपर्यंत | पुणे (अंशतः), अहमदनगर, (अंशतः), सोलापूर, उस्मानाबाद |
| ७ | तापी | मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव | तापी खोरे (अमरावती प्रदेशातील तापी खोरे वगळून) | जळगाव, नंदुरबार, धुळे |
| ८ | कोकणातील पश्चिम वाहिनी नद्यांची खोरी | मुख्य अभियंता, कोंकण प्रदेश, जलसंपदा विभाग, मुंबई | कोकणातील लहान मोठी २२ खोरी | ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग |

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८२५१७३९००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( च.आ.बिराजदार)
मुख्य अभियंता (पाटबंधारे) व सह सचिव

FILENAME \p C:\DOCUME~1\CHAVAN~1\Desktop\~6612930.doc

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव.
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
खाजगी सचिव, मा. मंत्री जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, मा. मंत्री जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई.
सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग.
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग.
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
कार्यासन सिंव्य धो संग्रहार्थ.